# आरती संग्रह

# आरती संग्रह




## अनुक्रमणिका

# आरती संग्रह




## अनुक्रमणिका



# ।। श्री गणपती स्तोत्र ।।

साष्टांग नमन हे माझें गौरीपुत्रा विनायका
भक्तीने स्मरतां नित्य आयु:कामार्थ साधती ।.१ ।।
प्रथम नाव वक्रतुंड दुसरे एकदंत तें ।
तिसरे कृष्णपिंगाक्ष चवथे गजवक्र तें ।।२।।
पांचवे श्रीलंबोदर सहावें विकट नांव तें ।
सातवे विघ्नराजेंद्र आठवे धुम्रवर्ण तें ।।३।।
नववें श्री भालचंद्र दहावें श्रीविनयक ।
अकरावें गणपति बारावें श्रीगजानन ।।४।।
देवनावें अशी बारा तीन संध्या म्हणे नर ।
विघ्नभीति नसे त्याला प्रभो । तू; सर्वसिद्धि दे ।।५।।
विद्यार्थ्याला मिळे विद्या धनार्थ्याला मिळे धन ।
पुत्रार्थ्याला मिळे पुत्र मोक्षार्थ्याला मिळे गि ।।६।।
जपतागणपती स्तोत्र सहा मासांत हे फळ ।
एक वर्ष पूर्ण होता मिळे सिद्धि न संशय ।।७।।
नारदांनी रचिलेले झालें संपुर्ण स्तोत्र हें ।
श्रीधराने मराठीत पठण्या अनुवादिलें ।।८।।



# सुखकर्ता दु:खहर्ता वार्ता विघ्नाची ।

सुखकर्ता दु :खहर्ता वार्ता विघ्नाची ।
नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ॥ ध॥
सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची ॥
कंठी झळके माळ मुक्ताफळांची ॥जय ॥ १॥
जय देव जय देव जय मंगलमूर्ती।
दर्शनमात्रें मन:कामना पुरती ।
रत्नखचित फरा तुज गौरीकुंमरा ॥
चंदनाची उटी कुंकमकेशरा ॥
हिरेजडित मुकुट शोभतो बरा ।
रूणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥ जय॥२॥
लंबोदर पीतांबर फणिवरबंधना ।
सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ॥
दास रामाचा वाट पाहे सदना ॥
संकटी पावावे, निर्वाणी रक्षावे, सुरवर वंदना ॥
जय देव जय देव जय मंगलमूर्ती।
दर्शनमात्रें मनकामना पुरती ॥ जय ॥ ३॥



# आरती गणपतीची

उंदरावर बैसोनी दुडदूडां येसी ।
हाती मोदक लाडू घेउनियां खासी ॥
भक्तांचे संकटी धावुनियां पावसी ।
दास विनवीती तुझिया चरणांसी ॥
जय देव जय देव जय गणराया
सकळ देवांआधीं तूं देव माझा ॥ जय देव ॥ १ ॥

भाद्रपदमासीं होसी तूं भोळा ।
आरक्त पुष्पांच्या घालुनियां माळा ॥
कपाळी लावुनि कस्तुरी टिळा ।
तेणें तूं दिससी सुंदर सावळा ॥ जय देव ॥ २ ॥

प्रदोषांचे दिवशीं चंद्र शापिला ।
समयीं देव मोठा आकांत केला ॥
इंदु येवोनी चरणीं लागला ।
श्रीरामा बहुत शाप दिधला ॥ जय ॥ ३ ॥

पार्वतीच्या सूता तूं ये गणनाथा ।
नेत्र शिणले तुझी वाट पाहतां ॥
किती अंत पाहसी बा विघ्नहर्ता ॥
मजला बुध्दी देई तूं गणनाथा ॥ जय ॥ ४ ॥



# आधी वंदू तुज मोरया

गजानना श्री गणराया ।

आधी वंदू तुज मोरया ॥

मंगलमूर्ती श्री गणराया ।

आधी वंदू तुज मोरया ॥ १॥

सिंदुरचर्चित धवळे अंग ।

चंदन उटी खुलवी रंग ॥

बघतां मानस होते दंग ।

जीव जडला चरणी तुझिया ॥ २॥

गौरीतनया भालचंद्रा ।

देवा कृपेच्या तूं समुद्रा ॥

वरदविनायक करूणागारा ।

अवघी विघ्ने नेसी विलया ॥ ३॥



# श्री शंकराची आरती

लवथवती विक्राळा ब्रह्मांडीं माळा ||
विषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा ||
लावण्यसुंदर मस्तकीं बाळा ||
तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझुळां
जय देव जय देव श्रीशंकरा ||
आरती ओवाळूं तुज कर्पूरगौरा ||१ ||
कर्पुरगौरा भोळा नयनीं विशाळा ||
अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा ||
विभुतीचें उधळण शितिकंठ नीळा ||
ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा |जय || २||
देवीं दैत्यीं सागरमंथन पैं केलें ||
त्यामाजीं अवचित हलाहल उठिलें |
तें त्वां असुरपणें प्राशन केलें ||
नीलकंठ नाम प्रसिध्द झालें || जय|| ३||
व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी ||
पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी ||
शतकोटींचें बीज वाचे उच्चारी ||
रघुकुळटिळक रामदासा अंतरीं || जय || ४||



# दुर्गादेवीची आरती

दुर्गे दुर्घट भारी तुजविण ससारीं ॥
अनाथनाथें अंबे करूणा विस्तारीं ॥
वारीं वारीं जन्ममरणातें वारीं ॥
हारीं पडलों आता संकट निवारीं ॥
जय देवी जय देवी महिषासुरमथिनी ॥
सुरवरईश्वरवरदे तारक संजिवनी ॥ जय... ॥ ध्रु ॥
त्रिभुवनभुवनीं पहातां तुज ऐसी नाहीं ॥
चारी श्रमले परंतु न बोलवे कांही ॥
साही विवाद करितां पडले प्रवाहीं ॥
ते तूं भक्तांलागी पावसि लवलाही ॥ जय... ॥ २ ॥
प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासा ॥
क्लेशापासुनि सोडीं तोडीं भवपाशा ॥
अबें तुजवाचून कोण पुरविल आशा ॥
नरहरि तल्लिन झाला पदपंकजलेशा ॥ जय... ॥ ३ ॥



# विठोबाची आरती

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा।
वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा।
पुंडलिकाचे भेटी परब्रम्ह आले गा।
चरणी वाहे भीमा उध्दरी जगा।
जय देव जय देव जय पांडुरंगा।
रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा॥ १॥
तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं।
कांसे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं।
देव सुरवर नित्य येती भेटी।
गरूड हनुमंत पुढें उभे राहती॥ २॥
धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा।
सुवर्णाची कमळें वनमाळा गळा।
राई रखुमाबाई राणीया सकळा।
ओवाळीती राजा विठोबा सावळा॥ ३॥
ओवाळू आरत्या कुरवंडया येती।
चंद्रभागेमाजी सोडूनिया देती।
दिंडया पताका वैष्णव नाचती।
पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ ४॥
आषाढी कार्तिकी भक्तजन येती ।
चंद्रभागेमाजी स्नानें जे करिती।
दर्शनहेळामात्रे तयां होय मुक्ती
केशवासी नामदेव भावें ओवाळीती ॥ ५॥



# विठ्ठलाची आरती

येई हो विठ्ठले माझे माउली ये ||
निढळावरी कर ठेवुनि वाट मी पाहे || ध||

आलिया गेलिया हातीं धाडीं निरोप ||
पंढरपुरी आहे माझा मायबाप|| येई || १||

पिवळा पीतांबर कैसा गगनीं झळकला |
गरूडावरी बैसोनि माझा कैवारी आला || येई || २||

विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिपवाळी ||
विष्णुदास नामा जीवेंभावें ओवाळी || येई || ३||

असो नसो भाव आम्हां तुझीया ठायां |
कृपा दृष्टी पाहे माझ्या पंढरीराया || येई || ४||



# एकविरा देवीची आरती

येई  हो एकविरा देवी माझे माउली ये।
माझे माऊली ये ॥
दोन्ही कर जोडूनि तुमची वाट मी पाहे ॥ ध्र॥

आलीया गेलीया अंबे धाडी निरोप।
कारल्यामध्ये आहे माझी एकवीरा माय॥ येई ॥ १॥

पिवळी साडी ही कैसा गगनीं झळकली।
अंबे गगनीं झळकली ॥
व्याघ्रावरी बैसोनि माझी एकवीरा देवी आली ॥ २॥

एकवीराचे राज्य आम्हां नित्य दिपवाळी ॥
एकवीरा देवी नाम तुमचे भावें ओवाळी॥ येई ॥ ३॥



# हिरादेवी आईची आरती

नमितो तुजला हिरादेवी ठेवितो चरणी माथा, आई ठेवितो चरणी माथा।
अजाण आम्ही तुझी बालके तू आमची माता, आई तू आमची माता।।ध्रृ।।

मन इच्छिले ते पावले दारी तुझ्या येऊनी, आई दारी तुझ्या येऊनी।
देई आशिर्वाद आम्हा सर्वा प्रसन्न होऊनी, आई सर्वा प्रसन्न होऊनी।।
मन गुंतले तुझ्याच पायी भान नसे आम्हा, आई भान नसे आम्हा।।
अजाण आम्ही तुझी बालके... ।।१।।

टाळ, मृदंग, ढोल वाजुनी गान तुझे गातो, आई गान तुझे गातो।
तुझिया नामी रंगुनिया आम्हा आंनद होतो, आई आम्हा आंनद होतो।।
शब्द बापुडे असे तरी तू घे मानुनी माता, आई तू घे मानुनी माता।।
अजाण आम्ही तुझी बालके... ।।२।।

मंगळवारी आरतीस मन प्रसन्न होते, आई मन प्रसन्न होते।
लहान थोर सारी जनता मंदिरात जमते, आई मंदिरात जमते।।
भाव त्याचा जानूनी त्यांना इच्छित वर द्यावा, आई इच्छित वर द्यावा।।
अजाण आम्ही तुझी बालके... ।।३।।

# आरती दशाअवतारांची



आरती सप्रेम जय जय विठ्ठल परब्रम्ह।
भक्त संकटी नाना स्वरूपी स्थापिसी स्वधर्म॥ १॥

अंनत्रऋषिकारणे गर्भवास सोशीसी।
वेद नेले चोरूनि ब्रम्हा आणुनिया देसी।
मत्सरूपी नारायण सप्तही सागर धुंडीसी।
हस्त लागता तुझा शंखासुरा वर देसी आरती॥ २॥

रसातळासी जाता पृथ्वी पाठीवर घेसी।
परोपकारासाठी देवा कासव झालासी।
दाढे धरूनी पृथ्वी नेता वराहरूप होसी।
प्रल्हादा कारणे नरहरि स्तंभी गुरगुरसी आरती॥ ३॥

पाचवे अवतार बळीच्या व्दाराला जासी।
भिक्षे स्थळ मागुनी बळीला पाताळा नेसी।
सर्व समर्पण केले म्हणुनी प्रसन्न त्या होसी।
वामनरूप धरूनी बळीच्या व्दारी तिष्ठसी ॥ ४॥

सहस्त्रार्जुन मातला जमदग्नीचा वध केला।
कष्टी ते रेणूका म्हणुनी सहस्त्रार्जुन वधीला।
नि:क्षत्री पृथ्वी दान दिधली विप्राला।
सहावा अवतार परशुराम प्रगटला ॥ ५॥

मातला रावण सर्वा उपद्रव केला।
तेहतीस कोटी देव बंदी हरले सीतेला।
पितृवचनासाठी रामे वनवास केला।
मिळोनी वानरसेना राजाराज प्रगटला आरती।। ६।।

देवकी वसुदेव  बंदी मोचन त्वा केले।
नंदाघरी जावूनी निजसुख गोकुळा दिधळे।
गोरस चोरी करता नवलक्ष गोपाळ मिळविळे।
गोपिकांचे प्रेम देखुनी श्रीकृष्ण भुलले  ।। ७ ।।

बौदध कलंकी कलयुगीं झाला अधर्म हा अवघा।
सोडून दिधळा धर्म म्हणुनी न दिरासी देवा।
म्लेंच्छमर्दन करीसी म्हणुनी कलंकी केशवा।
बहिरवी जान्हवी निज सुखनंदाची सेवा आरती  ।। ८।।



# आरती दत्ताची

त्रिगुणात्मक त्रैमुर्ती दत्त हा जाणा ।
त्रिगुणी अवतार त्रैलोक्य राणा ।
नेति नेति शब्द नये अनुमाना ।
सुरवर मुनिजन योगी समाधि न ये ध्याना ।
जय देव जय देव जय श्रीगुरूदत्ता ।
आरती ओवाळितां हरली भवचिंता ॥ धृ ॥

सबाह्य अभ्यंतरी तूं एक दत्त ।
अभाग्यासी कैंची कळेल ही मात ।
पराही परतली तेथे कैंचा हा हेत ।
जन्ममरणाचा पुरलासे अंत ॥ जय ॥ १॥

दत्त येऊनियां उभा ठाकला ।
सद्भावे साष्टांगेसीं प्रणिपात केला ।
प्रसन्न होऊनी आशीर्वाद दिधला
जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ जय ॥ २॥

दत्त दत्त ऐंसे लागले ध्यान ।
हारपलें मन झालें उन्मन ।
मी तूं पणाची झालीं बोळवण ।
एका जर्नादनी श्रीदत्त जाण ॥ जय ॥ ३ ॥



# आरती जगदिशाची

ओम जय जगदिश हरे। स्वामी जय जगदिश हरे।
भक्तजनों के संकट दास जनो के संकट क्षण में दूर करे।
ओम. . . ॥ १॥

जो ध्यावे फल पावे दुख विनसे मन का स्वामी. . . ।
सुख संपत्ती घर आवे कष्ट मिटे तन का ओम ॥ २॥

माता पिता तुम मेरे। शरण पडुं मैं किसकी स्वामी. . .
तुम बिन और न दुजा। आस करू मै किसकी ओम॥ ३॥

तुम पुरंण परमात्मा, तुम अंतर्यामी स्वामी. . .
परब्रम्ह परमेश्वर तुम सबके स्वामी। ओम॥ ४॥

तुम करूणाके सागर तुम पालन करता स्वामी. . .
मै मुरख फलकामी मै सेवक तुम स्वामी कृपा करो हरता ओम॥ ५॥

विषय विकार मिटाओ, पाप हरो देवा स्वामी. . . ।
श्रध्दा भक्ती बढाओ। सनतन की सेवा. . . ॥ ६॥

तन मन धन सब है तेरा स्वामी. . . ।
तेरा तुझको अर्पण क्या लागे मेरा ओम ॥ ७॥

दीनबंधु दु:खहर्ता ठाकूर तुम मेरे, स्वामी. . . ।
रक्षक तुम मेरे। अपने हाथ उठाओ, अपने शरण बिठाओ
द्वार खडा मै तेरे ओम ॥ ८॥ ॥ ८॥



# आरती रामाची

त्रिभुवन मंडीतमाळ शोभतो गळा (२)

आरती ओवाळू पाहू ब्रम्ह पुतळा (२)

बोलो श्रीराम जयराम जयजय राम (२)

आरती ओवाळू पाहू सुंदर मेघश्याम (२)

ठकारांचे ठाण करी धनुष्य बाण (२)

मारूती सन्मुख उभा कर जोडून (२)

भरत शत्रूघन दोघे चौऱ्या ढाळीती (२)

स्वर्गीहून देव पुष्पवृष्टी करीता (२)

रत्नखचित माणिक वर्णू काय मुकूटी (२)

आरती ओवाळू चौदा भुवनाच्या पोटी (२)

विष्णूदास नामा म्हणे मागतो तू दे (२)

आरती ओवाळू पाहू सितापतीते (२)





# साईबाबाची आरती

आरती साईबाबा। सौख्य दातार जीवा।
चरण रजतळी द्यावा दासा विसावा भक्ता विसावा आरती ||

जाळुनिया अनंग सस्वरूपी राहे दंग।
मुमुक्षजना दावी निज डोळा श्रीरंग || आरती साईबाबा ||

जयामनी जैसा भाव, तया तैसा अनुभव।
दावीसी दयाधना ऐसा तुझा यो भाव || आरती साईबाबा ||

तुमचे नाम घेता, हरे संस्कृती व्यथा।
अगाध तव करणी, मार्ग दावीसी अनाथा || आरती साईबाबा ||

कलियुगी अवतार, सगुणब्रम्ह साचार।
अवतीर्ण झालासी, स्वामी दत्त दिगंबर || आरती साईबाबा ||

आठादिवसा गुरूवारी, भक्त करीती वारी।
प्रभूपद पहावया, भवभरा निवारी || आरती साईबाबा ||

माझनीजद्रव्य ठेवा, तव चरणरज सेवा।
मागणे हेची आता, तुम्हा देवाधी देवा || आरती साईबाबा ||

इच्छित दिन चातक, निर्मळ तोय निज सुख।
पाजावे माधवा या सांभाळ आपुली भाक || आरती साईबाबा ||



# साईबाबाची आरती

साई रहम नजर करना बच्चो का पालन करना,
जाना तुने जगत पसारा सबही झुठ जमाना ||

मैं अंधा हू बंदा आपका | मुझको प्रभू दिखलाना ||

साई रहम नजर करना बच्चो का पालन करना,
जाना तुने जगत पसारा सबही झुठ जमाना ||

दासगनू कहे अब क्या बोलू, थक गयी मेरी असना ||

साई रहम नजर करना बच्चो का पालन करना,
जाना तुने जगत पसारा सबही झुठ जमाना ||



# आरती नित्यानंदची

श्री सच्चिदानंद सदगुरू साईनाथ महाराज की जय
जय जय आरती नित्यानंद राया। सगुणारूपी गोविंदा।
प्रथमा दत्तरूप घेसी। द्वितीया श्रीपाद होसी।
तृतीया नरहरी बनसी। त्या गाणगानुरी लिला दावीसी।।
जय जय. . . . .

महाडीक प्रभू तू होसी। अक्कलकोट स्वामी बनसी।
शिर्डी साईनाथ होसी। त्या गणेशपूरी तू वससी।।
जय जय. . . . .

वो ऐसे अनेक रूप तू घेसी। त्या कनकवळी भालचंद्र होसी।
त्या शेगावी गजानन होसी। त्या बाळांना बहू आवडशी।
त्या बाळांच्या इच्छा पुरविशी।
जय जय. . . . .

पावना शंभो, पतीत पावना शंभो,
ये रं वनमाळी सावळया, नारायणा हरी, या भक्तजना सांभाळी
सावळया येरं वनमाळीपावना

पावना दत्ता दत्ता दत्ता पावना दत्ता, पावना दत्ता पतित
पावना दत्ता

वंदीला बोलो, आज्ञा वंदीला बोलो
वो भजे राजे गोविंद, भजे राजे गोविंद

आले भजनी मोर नाचतो अंगणी, पायाकडे पाहुनी
पायाकडे पाहुनी नाचतो पायाकडे पाहुनी । वो आले

लाल फुलांचा मवू बिछाना साईना झोप लागेना
गोविंद बोलो हरी, गोपाळ बोलो
राधा रमण हरी गोपाळ बोलो
पायी हळूहळू चाला मुखाने साईनाम बोला



# आरती मंगेश महारूद्रा

मंगेश महारूद्रा, मंगेश महारूद्रा ॥
जय पार्वती वरा, पार्वती वरा आरती ओवाळीन ।
शिव भोळया शंकरा, भोळया शंकरा ॥ मंगेश महारूद्रा. . . .

आपुले म्हणवीशी, देशील आणिक हाती हसतील संतजन
कृपा सागर मुर्ती । मंगेश महारूद्रा. . . .

सर्वत्र व्यापलासी, जळी स्थळी पाषीणी कृपेचा सागर हो
आम्हा पावे निर्वाणी । मंगेश महारूद्रा. . . .

विभूती व्यापलासी, गजचर्म परीधान वासुकी हार शोभे
आला कृष्ण शरण । मंगेश महारूद्रा. . . .



# आरती नारायणाची

विडा घ्या हो नारायण। कृष्ण जगत जीवना।
विनवते रखुमाई दासी होवून मी काना।
विडा घ्या हो नारायणा॥

वासना फोडूनिया चुर्ण केली सुपारी।
भावार्थ कापुराने घोलीयेली निर्धारी॥
विडा घ्या हो नारायणा॥

शांती हे नागवेल, पाने घेवूनिया करी।
मी पणा जाळूनिया, चूना लावीला वरी॥
विडा घ्या हो नारायणा॥

विवेकहा कात रंग रंगी रंगिला सुरंग।
वैराग्य जायफळ, मिळविळे सकळ॥
विडा घ्या हो नारायणा॥

दया हे जायपत्री, क्षमा लवंग आणिल्या।
सुबुदधी बेलहोडे शिवारामे अर्पियेली॥
विडा घ्या हो नारायणा॥

# आरती प्रदक्षिणा

धन्य धन्य हे प्रदक्षिणा सद्‌गुरूरायाची ।
झाली त्वरा सुरवरां । विमान उतरायाची ॥ १ ॥

पदोपदी अपार झाल्या पुण्याच्या राशी ।
सर्वहि तीर्थ घडली आम्हां आदिकरूनि काशी ॥
धन्य धन्य हे प्रदक्षिणा. . . . . . . . . ॥ २ ॥

मृदुंग टाळ ढोल भक्त भावार्थे गाती ।
नामसंकीर्तनें ब्रह्मानंदे नाचती ॥
धन्य धन्य हे प्रदक्षिणा. . . . . . . . . ॥ ३ ॥

कोटि ब्रह्महत्या हरिती करितां दंडवत ।
लोटांगण घालीतां मोक्ष लोळे पायांत ॥
धन्य धन्य हे प्रदक्षिणा. . . . . . . . . ॥ ४ ॥

गुरूभजनाचा महिमा न कळे आगमा निगमासी ।
अनुभव ते जाणती जे गुरूपदिंचे रहिवासी ॥
धन्य धन्य हे प्रदक्षिणा. . . . . . . . . . ॥ ५ ॥

प्रदक्षिणा करूनि देह भावें वाहिला ।
श्रीरंगात्मज विठ्ठल पुढे उभा राहिला ॥
धन्य धन्य हे प्रदक्षिणा. . . . . . . . . . ॥ ६ ॥



# आरती ज्ञानराजाची

आरती ज्ञानराजा, आरती ज्ञानराजा।
महाकैवल्य तेजा कैवल्य तेजा।
सेवती साधुसंत मन वेधळा माझा,
वेधळा माझा आरती ज्ञानराजा॥ १ ॥

लोपले ज्ञान जगी, लोपले ज्ञान जगी।
हित नेणती कोणी, नेणती कोणी।
अवतार पांडूरंग, नाम ठेविले ज्ञानी,
ठेविले ज्ञानी आरती ज्ञानराजा॥ २ ॥

कनकाचे ताट करी, कनकाचे ताट करी।
उभ्या गोपिका नारी, गोपिका नारी।
नारद तुंबरो हो। साम गायन करी, गायन करी।
आरती ज्ञानराजा॥ ३ ॥

प्रकट गुह्य बोले, प्रगट गुह्य बोले।
विश्व ब्रम्हाची केले, ब्रम्हाची केले।
राम जनार्दनी, पायी मस्तक ठेविले,
मस्तक ठेविले। आरती. . . ॥ ३ ॥



# आरती एकनाथाची

आरती एकनाथा, आरती एकनाथा। महाराजा समर्थ, राजा समर्थ।
त्रिभुवनी तुच थोर, जगदगुरू जगन्नाथा, गुरू जगन्नाथा॥ आरती... ॥१॥

एकनाथ नाम सार, एकनाथ नाम सार। वेद शास्त्रांचे गुंज, शास्त्रांचे गुंज।
दु:खनासे, महामंत्राचे बिज, मंत्राचे बिज॥ आरती... ॥२॥

एकनाथ नाम घेता, एकनाथ नाम घेता। सुख वाटले चित्ता, वाटले चित्ता।
अनंत गोपाळदास, धनी नपुरे गाता, नपुरे गाता॥ आरती... ॥३॥



# आरती तुकारामाची

आरती तुकारामा, आरती तुकारामा। स्वामी सद्गुरू धामा, सद्गुरू धामा।
सचिदानंद मुर्ती। पाय दाखवी आम्हा, दाखवी आम्हा॥ आरती... ॥१॥

राधवे सागरात, राधवे सागरात। पाषाण तारीले, पाषाण तारीले।
तैसे हे तुकोबाचे। अभंग उदकी रक्षीले, उदकी रक्षीले। आरती... ॥२॥

तुकीता तुलनेसी, तुकीता तुलनेसी। ब्रम्ह तुकासी आले, तुकासी आले।
म्हणुनी रामेश्वर। चरणी मस्तक ठेवीले, मस्तक ठेवीले। आरती... ॥३॥



# आरती रामदासाची

आरती रामदासा, आरती रामदासा।
भक्त विरक्त इर्षा, विरक्त इर्षा।
उगवला ज्ञानसुर्य। उजळोनी प्रकाश,
लोनी प्रकाश। आरती... ॥१॥

साक्षात शंकराचा, साक्षात शंकराचा।
अवतार मारूती, अवतार मारूती।
कलिमाजी तेचि झाली।
रामदासांची मुर्ती, दासांची मुती। आरती... ॥२॥

विसहो दशकांचा, विसहो दशकांचा।
दासबोध ग्रंथ केला, बोध ग्रंथ केला।
जडजीवा उध्दरीले।
नृप शिवासी तारीले, शिवासी तारिले। आरती... ॥३॥

ब्रम्हचार्य व्रत ज्याचे,ब्रम्हचार्य व्रत ज्याचे।
रामरूप सृष्टी पाहे,रूप सृष्टी पाहे।
कल्याण तिन्ही लोकी।
स्वामी सद्गुरू पाहे, सद्गुरू पाहे। आरती... ॥४॥



# बाप्पा आले हो आले

बाप्पा आले हो आले । वाजत गाजत आले ॥

एक, दोन, तीन, चार गणपतीचा जयजयकार ॥
बाप्पा आले. . . ॥१॥

पाच, सहा, सात, आठ गणपतीला सोन्याचा पाट ॥
बाप्पा आले. . . ॥२॥

नऊ, दहा, अकरा, बारा गणपतीला वाहू दुर्वा ॥
बाप्पा आले. . . ॥३॥

तेरा,चौदा, पंधरा, सोळा गणपतीच्या पायात वाळा ॥
बाप्पा आले. . . ॥४॥

सतरा, अठरा, एकोणीस, वीस गणपतीला मोदक एकवीस ॥
बाप्पा आले. . . ॥५॥

# आरती भजन

घालीन लोटांगण वंदीन चरण। डोळयांनि पाहिन रुप तुझे ।।
प्रेमें आलिंगन आनंदें पूजिन । भावें ओंवाळिन म्हणे नामा ।।१।।

त्वमेव माता च पिता त्वमेव, बंधुश्च सखा त्वमेव।।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्व मम देव देव ।।२।।

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा,
बुध्दयात्मना वा प्रकृतिस्वाभावात् करोमि यद्यत् सकलं परस्मै,
नाराणायेति समर्पयामि।।३।।

अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम्।।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्र भजे ।।४।।

हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।५।।

# मोरया मोरया
# अष्टविनायक मोरया...

१) मोरेश्वर
२) सिध्दीविनायक
३) चिंतामणी
४) महागणपती
५) विघ्नेश्वर
६) गिरीजात्मक
७) वरदविनायक
८) बल्लाळेश्वर
९) पार्वतीनंदन
१०)शंकरनंदन
११) मंगळमुर्ती
१२) वक्रतुंड
१३) एकदंत
१४) हेरंब बाप्पा
१५) गजानन
१६) गणराया
१७) गणाधिक्ष
१८) लंबोदर
१९) विनायक
२०) उमापुत्र
२१) सुखकर्ता
२२) दुःखहर्ता
२३) शुपकर्ण
२४) बुध्दीसागर
२५) करुणासागर
२६) गौरीनंदन
२७) विघ्नराज
२८) गौरीकुमरा
२९) भालचंद्र
३०) करुणागारा
३१) गणराजा
३२) कपिलबाप्पा
३३) विकटबाप्पा
३४) धुम्रकेतू
३५) ऋणुनुबंध
३६) रिध्दीश्वर
३७) गौरीहरा
३८) धर्मवर्ण
३९) गजवक्र
४०) आदीदेव
४१) विघ्नराजेंद्र
४२) ब्रम्हणस्पती
४३) महोदर
४४) श्रीगणेश

# निरोपपर गीत



जाहलें भजन आम्ही नमितों तव चरणां। नमितो तव चरणां।
वारुनिया विघ्नें देवा रक्षावे दीना ।।धृ०।।

दास तुझे आम्ही देवा तुजलचि ध्यातों। देवा तुजलाचर ध्यातों।
प्रेमें करुनियां देवा गुण तुझे गातो।।१।।

तरी न्यावी सिध्दि देवा हेचि वासना। देवा हेचि वासना ।
रक्षुनियां सर्वा द्यावी आम्हांसी आज्ञा ।।२।।

मागणें तें देवा आतां एकची आहे। आतां एकची आहे।
तारुनियां सकळां आम्हां कृपा दृष्टी पाहें ।।३।।

जेव्हां सर्व आम्ही मिळ ऐशा या ठाया। ऐशा या ठाया ।
प्रेमानंदें लागूं तूझी कीर्ती गावया।।४।।

सदां ऐशी भक्ती राहो आमुच्या मनीं। आमुच्या मनीं।
हेचि देवा तुम्हां असे नित्य विनवणी ।।५।।

वारुनियां संकटे आतां आमुची सारीं। आता आमुची सारी।
कृपेची साऊली देवा दीनावरिक करीं ।। जाहले ... ।।६।।

निरंतर आमुची चिंता तुम्हां असावी। चिंता तुम्हा असावी।
सर्वांची लज्जा देवा तुम्ही रक्षावी ।। जहले ...।।७।।

निरोप घेतो आता आज्ञा असावी ।
चुकलें आमचें काहीं त्याची क्षमा असावी ।। जाहलें ... ।।८।।

# मंत्रपुष्पांजली

ओम यज्ञेन यज्ञमयजं तदेवास्तानि धर्मणि प्रथमान्यासन् ।
ते हं नाकं महिमान सचंत यत्र पूर्वे साध्या: संतिदेवा: । ओम्
राजाधिराजाय प्रसह्य साहिने मो वयं वैश्रवणायं कुर्महे ।
स मे कामान कामकामाय मह्यं कामेश्वरो वैश्रमणो ददातु ।।
कुबेराय वैश्रवणाय महारजाय नम: । ओम् स्वस्ति
साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठयं राज्यंह
महाराज्यमाधिपत्यमयं समंतपर्या ईस्यात सार्वभौम:ई
सर्वायुष आंतादापरार्धात् । पृथिव्यै समुद्रपर्यंताया
एकराळिति ।। तदप्येषश्लोकोभिगीतो मरूत: परिवेष्टारो
मरूत्तस्यावसन् गृहे ।। आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवा:
सभासद इति ।।

एकदंताय विद्महे । वक्रतुंडाय धिमहि ।।
तन्नो दंती प्रचोदयात् ।।

गणपती बाप्पा मोरया । पुढच्या वर्षी लवकर या ।।